# मनास बोध.

हें काव्य

**गंगाधर सीताराम अभंग अतीतकर**
माजी स्कूलमास्तर हरसोला जिल्हे इंदूर.
'पद्यात्मक' तोंडचे हिरेबांचे कर्ते.

यांनीं

आत्म हितास्तव रचिलें.




तें,

इंदूर येथें—
**"श्रीलक्ष्मी-विलास" छा० छा०**
आवृत्ति १ ली, प्रती १०००
सन १९०८



किंमत ४ आणे.

# अर्पण पत्रिका.

माझी जन्मदात्री

तीर्थरूप गंगाभागीरथी जानकी मातुश्रीचे चरणारविंदीं, हें काव्य पुत्र वात्सल्य भावानें, प्रेम पुरःसर अत्यंत लीनतेनें, अर्पण केलें असे.

नम्र सेवक,

गंगाधर सीताराम अभंग.

# आश्रय दात्यांचीं नांवें.

श्रीमंत सेतुराम महाराज पवार साहेब संस्थान मलठण.

श्रीमंत सरदार संताजीराव बनसुडे जावईबुवा साहेब होळकर सरकार.

श्रीमती मोठ्या मासाहेब संस्थान धार.

श्रीमती गोजरा मासाहेब संस्थान देवास, पाती २

रावसाहेब कृष्णराव गोविंद रेशीमवाले व आनंदीमित्र-समाज इंदूर.

सदरहू पुस्तक छापण्यास वरील, श्रीमंत व गुणज्ञ रसिक लोकांनीं उदाराश्रय दिल्या बद्दल, पुस्तक कर्ता सर्वांचा फार फार आभारी आहे.

गंगाधर सीताराम अभंग.

# प्रस्तावना.

सांप्रत काळीं, कांहीं स्वार्थ व परमार्थ साधावा अशी इच्छा धारण करून, " **मनास बोध** " या नांवाचें काव्य **श्री** षड्गुणैश्वर्य संपन्न विश्वनाथ कृपाकटाक्षें तयार केलें तें " **मनास** " मान्य होऊन, फलदायक होवो अशी जगन्नियंत्यास प्रार्थना आहे.

या पुस्तकाच्या नांवावरूनच यांतील विषयाचें अनुमान वाचकांस सहज करितां येईल.

मु. इंदूर. पुस्तक कर्ता,

शके १८३० **गं. सी. अभंग.**

---

**सूचना** :–सदरहू पुस्तकें इंदूर येथें, न्याहालपुऱ्यांत **रामकृष्ण नथूसेट** सोनार यांजकडे विकत मिळतील.

॥श्रीशंकर समर्थ.॥

# मनास बोध.

## मंगलाचरण.

### ( भुजंग प्रयातवृत. )

॥ कुधी मूढ आहें नसे ज्ञान मातें ॥
॥ सुधी दे गणेशा नमो त्वत्पदातें ॥
॥ नमो शारदा बुद्धि द्यावी विशाळ ॥
॥ मना बोधितों बोध होवो रसाळ ॥ १ ॥
॥ महा पुण्यक्षेत्रीं करी वास काशी ॥
॥ कृपादृष्टिं पाहे सदा सेवकासी ॥
॥ जया दर्शनें नासती पाप-राशी ॥
॥ नमस्कार साष्टांग विश्वेश्वरासी ॥ २ ॥

॥ कृतांता दिसे काल कल्पांत रुद्र ॥
॥ परी दीन-दासा दयेचा-समुद्र ॥
॥ उमेशा हरा पाव या किंकराला ॥
॥ नमस्कार माझा शिवा-शंकराला ॥ ३ ॥
॥ दिसे भव्यमूर्ति प्रभा दिव्य अंगीं ॥
॥ वसे ज्ञान वैराग्य तें आत्मरंगीं ॥
॥ जयाचा गुरू श्रीपती चापधारी ॥
॥ नमीं रामदासा मना सद्विचारी ॥ ४ ॥
॥ मना बोधितां यत्न सिद्धीस नेला ॥
॥ जयें दासबोधामृत-ग्रंथ केला ॥
॥ मना तोचि रे सद्गुरू रामदास ॥
॥ नमस्कार माझा तयाचे पदास ॥ ५ ॥
॥ अकस्मात वैराग्य देहीं निमालें ॥

॥ चिदानंद रूपीं सदा मग्न झालें ॥
॥ जयें तोडिला शीघ्र संसार फांसा ॥
॥ नमस्कार माझा तया रामदासा ॥ ६ ॥

---

॥ मना चंचळा वेग तूझा अपार ॥
॥ शशी सूर्य वायू जलाहूनि पार ॥
॥ कुठें काशि कांची कुठे बद्रिनाथ ॥
॥ धरा सर्व पाहूनि येसी क्षणांत ॥ ७ ॥
॥ शिवा सारिखा देव नाहीं कृपाळ ॥
॥ सदा रक्षितो संकटीं विश्वपाळ ॥
॥ असा देव भोळा मनाला कळेना ॥
॥ तयाच्या-पदीं चित्त हें आकळेना ॥ ८ ॥
॥ विवेकें करावें मना कृत्य कांहीं ॥

॥ असें सांगती सद्गुरू नित्य पाहीं ॥
॥ स्वकर्मीं स्वधर्मीं सदा लक्ष्य ठेवीं ॥
॥ पिता देव माता गुरू-पाय सेवीं ॥ ९ ॥
॥ जसें कर्म ज्याचें तसी बुद्धि होते ॥
॥ जसा पुण्य ठेवा तसें सौख्य हो तें ॥
॥ ह्मणूनी मना चाल बापा सुमार्गीं ॥
॥ नको पाय ठेवूं कधीं आड-मार्गीं ॥ १०
॥ दुराचार लाचार सोडोनि द्यावा ॥
॥ सदाचार साचार तो शीघ्र घ्यावा ॥
॥ नसो लेश चित्तीं मना दुर्गुणाचा ॥
॥ सदा छंद लागो मना सद्गुणाचा ॥ ११ ॥
॥ स्वयें पाप कर्मा मना झांकितोसी ॥
॥ पराचे मना दोष कां चाखितोसी ॥

॥ परस्त्री बघूनी मना धांव घेसी ॥
॥ मना कामबाणें कसा अंध होसी ॥ १२ ॥
॥ मना द्वेष हेवा करोनी पराचा ॥
॥ वृथा लावणें डाग हा खापराचा ॥
॥ जरी तूज कांहीं मना काम नाहीं ॥
॥ जडो रामनामीं मना कामना ही ॥ १३ ॥
॥ कळोनी मना वागसी तूं कसारे ॥
॥ जना सांगसी ज्ञान वांयाचि सारें ॥
॥ असें वागतां स्वार्थ कांहीं घडेना ॥
॥ अहंता-बळें ईश दृष्टीं पडेना १४ ॥
॥ मना हांव आतां पुरे दुर्गुणाची ॥
॥ हृदीं साठवीं भूषणें सद्गुणाचीं ॥
॥ नको दुष्ट चाळे करूं पापराशी ॥

॥ कसा पावसी किंकरा शंकरासी ॥ १५ ॥
॥ कुधीं वासना निंद्य कर्मास त्यागी ॥
॥ दुराचारि होऊं नको मृत्यु-भागीं ॥
॥ कुमार्गीं मना वागतां सौख्य वाटे ॥
॥ परंतू पुढें बोचती तीव्र काटे ॥ १६ ॥
॥ नकोरे मना संग तो दुर्जनाचा ॥
॥ तनुग्रासितो नाश होतो धनाचा ॥
॥ जनीं दंभ दावूं नको मीपणाचा ॥
॥ गळां पाश घालूं नको दुर्गुणाचा ॥ १७ ॥
॥ जनीं हांसि होईल दुष्कर्म-योगें ॥
॥ जरा शीघ्र ये उग्र रोग भोगें ॥
॥ कळे निंद्य ऐसें मना दुर्विधान ॥
॥ तरी कां न होसी गड्या सावधान ॥ १८ ॥

। दिसे पापकर्मी जनीं दैन्यवाणा ॥
। परा ज्ञान सांगे ह्मणे मी शहाणा ॥
। मना ज्ञान त्याचें वदावें न वाचे ॥
। जिणें व्यर्थ लोकीं अशा मानवाचें ॥ १९ ॥
। सदा मूर्ख निंदी गुरू माय बाप ॥
। जना बोधुनी दावितो स्वप्रताप ॥
। जळो तोंड काळें बघावें न त्याचें ॥
। मना त्यास धिक्कार धिक्कार वाचे ॥ २० ॥
। दुराचार कर्में करी गुप्त पाप ॥
। कथी बोध लोकां स्वयें दुष्ट साप ॥
। कळोनी मना कोड पूर्वी जिवाचें ॥
। मना त्यास धिक्कार धिक्कार वाचे ॥ २१ ॥
। मना मित्रता जोडुनी मान कापी ॥

॥ मनीं गूढआटी कळेना कदापी ॥
॥ करी घात विश्वास देवोनि जो कीं ॥
॥ असो त्यास धिक्कार धिक्कार लोकीं॥ २२
॥ जसें ज्ञान लोकांप्रती सांगसी रे ॥
॥ मना कांव तैसा स्वयें वागसी रे ॥
॥ कळोनी पुन्हां पाप कर्मा विलोकी ॥
॥ मना तूज धिक्कार धिक्कार लोकीं ॥ २३ ॥
॥ मना चाड नाहीं जया लौकिकाची ॥
॥ नसे काळजी इष्टमित्रादिकांची ॥
॥ परा भोंदुनी डौल दावी जनाला ॥
॥ जरा लाज नाहीं तयाचें मनाला॥ २४ ॥
॥ धना मेळवूनी करी संचयासी ॥
॥ कधीं दान देणें न ठावें जयासी ॥

॥ कधीं स्तुत्य कर्मास पैका न वेंची ॥
॥ तमाशे मना नित्य पाहे नवेची ॥ २५ ॥
॥ धनें भुषवी काय वारांगनेचा ॥
॥ नसे पाड कांहीं स्वकीयांगनेचा ॥
॥ न दे खावया भीक मागे स्वमाई ॥
॥ जळो रे मना नष्ट त्याची कमाई ॥ २६ ॥
॥ पराचें करी कर्ज देई न बापा ॥
॥ मना दाखवीतो वरोनी लिफापा ॥
॥ वृथा कोरडा डौल दावी जनासी ॥
॥ पडे नित्य फाका गृहीं भोजनासी ॥ २७ ॥
॥ मना मिथ्य वाणी वृथा कां वदावी ॥
॥ तिये पासुनी कोणता लाभ दावी ॥
॥ असे कांहिं लोकां अशी निंद्य खोड ॥

॥ जयासी रुचेना मना सत्य गोड ॥ २८ ॥
॥ मना सर्वदा मिष्ट वाणी वदे तो ॥
॥ परा नादि लावूनियां दुःख देतो ॥
॥ करी मित्र होवोनियां हेतु भंग ॥
॥ असत्प्राय तो काय ज्याचा अभंग ॥ २९ ॥
॥ अशा दुर्मती मोह जाळीं फसावें ॥
॥ करोनी मना आत्म-हानी बसावें ॥
॥ मना दुर्जनाचा घडावा न संग ॥
॥ धरीं मार्ग ऐसा न यावा प्रसंग ॥ ३० ॥
॥ जयाचे नियोगें मति भ्रष्ट होते ॥
॥ धनाची वपूची सदा हानि हो-ते ॥
॥ अशा दुर्जनाचा नको संग बापा ॥
॥ भिऊनी रहावें तया जेंवि सापा ॥ ३१ ॥

॥ धनालागिं कां नीच कृत्यें करावीं ॥
॥ सुखालागिं कां दुष्ट बुद्धी धरावी ॥
॥ असें केलिया नाश होतो स्वताचा ॥
॥ ह्मणूनी मना बोध मानी हिताचा ॥ ३२ ॥
॥ करी कर्म खोटें मना गोड वाटे ॥
॥ हणी काळ सोटे पुढें शोक साटे ॥
॥ भयें चित्त फाटे उरीं कंप दाटे ॥
॥ यदा काळ भेटे तदा दुःख मोठें ॥ ३३ ॥
॥ मना दुर्गुणीं हौस तूझी पुरेना ॥
॥ मना दुष्कृती रंग ही ओसरेना ॥
॥ मना पातकीं दीर्घ तृष्णा हरेना ॥
॥ मना घातकीं दुष्ट आशा मरेना ॥ ३४ ॥
॥ दुराचारि भीतो मना सर्वदाही ॥

॥ तयासी नसे सौख्य स्वप्नीं कदाही ॥
॥ सुमार्गीं मना भीति नाहीं जनाची ॥
॥ नसे काळजी अल्प शंकाहि साची ॥ ३५
॥ मना जाणुनी भ्रांति कां रे फिटेना ॥
॥ बहू सेवितां चित्त कामीं विटेना ॥
॥ कुधी बंधनीं वज्र गाठी सुटेना ॥
॥ मना संसृतीं मोह माया तुटेना ॥ ३६ ॥
॥ मना स्नानसंध्या घडे ती न वेळीं ॥
॥ करी कर्म कांहीं परी ते अवेळीं ॥
॥ नहो पुण्य तें पाप देहीं उदेलें ॥
॥ मना ज्ञान अज्ञान होवोनि ठेलें ॥ ३७ ॥
॥ विधीची कृती कर्म रेषा टळेना ॥
॥ मना वासना निश्चयानें ढळेना ॥

॥ अझूनी मना चित्तवृत्ती वळेना ॥
॥ किती सांगणें ज्ञान मूर्खा कळेना ॥ ३८ ॥
॥ असा पापरूपीं  कसा जन्मलासी ॥
॥ खरा साम्य तूझें जिणें भूतलासीं ॥
॥ तुझा पामरा होय भूमीस भार ॥
॥ मना घातकी पातकी तूं अपार ॥ ३९ ॥
॥ मना सुंदरी मंदिरीं नारि नाहीं ॥
॥ तरी धांव घेई कुधी वासना ही ॥
॥ बहू नष्ट हा काम जाळी शरीरा ॥
॥ किती आवरावें मना या अधीरा ॥ ४० ॥
॥ खुळे मूर्ख त्यांचें जनीं लग्न होतें ॥
॥ गुणी मानवाचें मना कां न हो तें ॥
॥ मना कोणतें पूर्वी केलेसि पाप ॥

॥ ह्मणूनी मना भोगिसी काम ताप ॥ ४१ ॥
॥ परस्त्री मना सर्पिणी पापराशी ॥
॥ तिसी भोगितां डंखिनी काय नाशी ॥
॥ करी धर्मपत्नी सर्वे काम शांती ॥
॥ नसे धर्मपत्नी वरी नारि-शांती ॥ ४२ ॥
॥ विवेकें सदा आवरी बा मनाला ॥
॥ गिरा दीन दारा वरो वामनाला ॥
॥ नको वाहुं चिंता मना स्त्री-वियोगें ॥
॥ घडे भोगणें दुःख कर्मानु योगें ॥ ४३ ॥
॥ स्मराधीन कां होउनी होसि वेडा ॥
॥ पशू मानवी जाणिजे जेंवि रेडा ॥
॥ मना मोहिते मोहिनी काम-माया ॥
॥ ह्मणूनी मना होतसे मंद काया ॥ ४४ ॥

॥ मना काम बाधा करी व्यग्र चित्त ॥
॥ मना जाणिजे तेंचि अज्ञान पित्त ॥
॥ नसे अंतरीं पूर्ण सज्ञान वित्त ॥
॥ म्हणूनी मना चित्त होतें कुपित्त ॥ ४५ ॥
॥ मना काम रोगावरी एक जाण ॥
॥ असे औषधी ती खरी राम-बाण ॥
॥ विवेकाऽनुपाना मधें ज्ञान मात्रा ॥
॥ मना वेद्य आराम होई सुपात्रा ॥ ४६ ॥
॥ सुकर्मीं मना शांतता पथ्य पाळीं ॥
॥ मना राम—मात्रा वरी अंतकाळीं ॥
॥ सदा सेवितां रोग जातो विरामीं ॥
॥ मना सेवि ही औषधी फार नामी ॥ ४७ ॥
॥ कुधी संगतीचें त्यजावें कुपथ्य ॥

॥ सुधी संगतीचें धरावें सुपथ्य ॥
॥ असें वागतां काळ जातो सुखानें ॥
॥ मना राम-माळा जपावी मुखानें ॥ ४८ ॥
॥ जगीं पाहतां सौख्य नाहीं नृपाला ॥
॥ मना व्यर्थ कां दोष देसी कपाला ॥
॥ मना संचिता सारखें प्राप्त होतें ॥
॥ वृथा चिंतिता लभ्य कांहीं न हो तें ॥ ४९ ॥
॥ धना कारणें यत्न न्यायें करावा ॥
॥ बुधां मान्य हो मार्ग ऐसा धरावा ॥
॥ मना लाभ हानी घडे दैव योगें ॥
॥ नको दुःख मानूं तयाच्या वियोगें ॥ ५० ॥
॥ नको दाखवूं दीनता तूं जनाला ॥
॥ प्रसंगीं मना धैर्य द्यावें स्वताला ॥

॥ कसें होय याची न चिंता करावी ॥
॥ मना सर्वदा मोदवृत्ती धरावी ॥ ५१ ॥
॥ मना वागणें न्याय मार्गें सदाही ॥
॥ तरी सौख्य हो दुःख ना हो कदाही ॥
॥ अरंभीं मना वाटतें दुःख फार ॥
॥ परी शेवटीं लाभ होतो अपार ॥ ५२
॥ परा बोधितां बोधणें स्वल्प वाटे ॥
॥ स्वयें त्यापरी वागतां चित्त फाटे ॥
॥ परी नेम ठेवीं मना तूं क्रमानें ॥
॥ पुढें सौख्य लाधे तुझ्या विक्रमानें ॥ ५३ ॥
॥ मना मिष्ट वाणी सुधा तुल्य सेवीं ॥
॥ कटू भाषणीं प्रीति चित्तीं न ठेवीं ॥
॥ असें केलिया होसि लोकांत मान्य ॥

॥ मना साव ही साधनासे प्रधान्य ॥ ५४ ॥
॥ जडे दुर्गुणीं चित्त ज्याचें सलग्न ॥
॥ तया माजि राहे सदा तो निमग्न ॥
॥ तया वांचुनी अन्य वार्ता सुचेना ॥
॥ मना ज्ञान चर्चा तयासी रुचेना ॥ ५५ ॥
॥ सुधा मूर्ख मानी विषाचे-समान ॥
॥ विषालागिं देई सुधा साम्य मान ॥
॥ अशा दुर्जनाचा पडे अंगिं वारा ॥
॥ मना जन्म दुःखा मधें जाय सारा ॥ ५६ ॥
॥ मना दुर्गुणीं बद्ध होतां सदाही ॥
॥ तया भासताती दिशा शुन्य दाही ॥
॥ नसे सद्गुणीं आवडी ज्या नराला ॥
॥ रुचे बोध हा केंवि त्या पामराला ॥ ५७ ॥

॥ जयाचें हृदीं भावना शुद्ध नाहीं ॥
॥ तया बोधितां अर्थ लाभे न कांहीं ॥
॥ कळेना मना खोल अंतस्थ ज्याचें ॥
॥ वळेना मना बोधितां चित्त त्याचें ॥ ५८ ॥
॥ जयांचे मना लाड केलेसि फार ॥
॥ मना पुर्विले कोड त्यांचे अपार ॥
॥ परी ते न आले प्रसंगास कामा ॥
॥ मना व्याप संताप केला रिकामा ॥ ५९ ॥
॥ पराचे मुलां आपुलेसें कराया ॥
॥ बहू कष्ट केले मना त्वत्करा-या ॥
॥ परीणाम झाला अखेरीस गोड ॥
॥ जयांनीं मना मोडिली खूप खोड ॥ ६० ॥
॥ मना शिष्यवर्गी नसे एक पात्र ॥

॥ निघाले मना सर्व कैसे कुपात्र ॥
॥ जया सर्वदा बोधिलासे सुबोध ॥
॥ तयांनीं मना मांडिलासे विरोध ॥ ६१ ॥
॥ गुरु पासुनी अल्प विद्या शिकोनी ॥
॥ तयाशीं करी द्वेष निंदा चुकोनी ॥
॥ गुरुद्रोहि तो शिष्य चांडाळ पापी ॥
॥ मना तोंड त्याचें न पाहें कदापी ॥ ६२ ॥
॥ करी भार आभार ज्याचेवरी तूं ॥
॥ स्मरेना मनीं तो धरी दुष्ट हेतू ॥
॥ यशप्राप्ति नाहीं तुझ्या दैवि बारे ॥
॥ तरी कां वृथा कष्टि होसी मनारे ॥ ६३ ॥
॥ मना ज्यासि तूं मित्रता प्रेम जोडी ॥
॥ तुला भोंदुनी स्नेह संबंध तोडी ॥

॥ नसे सद्गुणाची मना ज्यास गोडी ॥
॥ तयाचा मना सर्वदा संग सोडी ॥ ६४ ॥
॥ विना मोल दे आपुली वस्तु लोकां ॥
॥ तरी त्यांस संतोष होतो विलोका ॥
॥ जरी मागतां मूल्य तीचे जयासी ॥
॥ पडे सांकडे रोष येतो तयासी ॥ ६५ ॥
॥ असे मित्र कांहीं मना स्वार्थ-साधू ॥
॥ वरी स्नेह दावूनियां द्रव्य भोंदू ॥
॥ अशांची परिक्षा प्रसंगास होते ॥
॥ खरे साह्यकारी मनारे नहो ते ॥ ६६ ॥
॥ मना मित्र तोची असे सुस्वभाव ॥
॥ नसे द्वैत दुर्बुद्धि कापट्य भाव ॥
॥ नसे दुर्गुणाची मना ज्यास गोडी ॥

॥ तयाशीं मना मित्रता सत्य जोडी ॥ ६७ ॥

॥ हजारी खरा एक मानी इमानी ॥
॥ जगीं पाहतां सर्वही लोक मानी ॥
॥ मना स्वार्थ साधावया दक्ष सारे ॥
॥ नसे लक्ष्य कांहींच पर्मार्थि बारे ॥ ६८ ॥

॥ मना कार्य-साधू वदे मिष्ठ वाणी ॥
॥ बहू लाघवी दाखवी अर्जवानीं ॥
॥ जणूं सत्य वक्ता खरा एक बाणी ॥
॥ असें दावुनी भाषणीं बाध आणी ॥ ६९ ॥

॥ मना काय गावी कथा मानवाची ॥
॥ मना विष्णु गीता कथामान वाची ॥
॥ करी सांग इच्छा जसा विश्वपाळ ॥
॥ मना शक्य नोहे तसा भूमिपाळ ॥ ७० ॥

॥ मना काय सेवा करावी जनाची ॥
॥ मना काय-सेवा करीं सज्जनाची ॥
॥ नको रे मना याचना ती धनाची ॥
॥ मना तोडि बेडी द्विधा बंधनाची ॥ ७१ ॥

## मनो राज्य

॥ मना नित्य मिष्टान्न भक्षावयासी ॥
॥ हवें गोड पाणी सदा प्यावयासी ॥
॥ सवें सर्वदा सोंगडी खेळण्यासी ॥
॥ मऊसा बिछाना मना लोळण्यासी ॥ ७२ ॥
॥ बसाया मना पाहिजे दिव्य घोडा ॥
॥ तसा इंग्रजी " बूट " पायांत जोडा ॥
॥ जरीचा शिरीं लाल रंगीत फेटा ॥

॥ मना रेशमाचा गळयासी दुपेटा ॥ ७३ ॥
॥ छडी शोकिनी पाहिजे ती हतांत ॥
॥ घडी शोभते जाकिटाचे खिशांत ॥
॥ सकाळीं चहा पाहिजे घ्यावयाला ॥
॥ मना दूध खासें वरी प्यावयाला ॥ ७४ ॥
॥ मना धोतरें रेशमी नेसण्याला ॥
॥ मना बाक खुर्च्या गृहीं बैसण्याला ॥
॥ मना भांग थोडी परी एक लोटा ॥
॥ तमाखू विडयाचा नसे कांहिं तोटा ॥७५॥
॥ चिरी लाल काळी खुले ती कपाळीं ॥
॥ घडीची झुले साखळी शुभ्र जाळी ॥
॥ नवा कोट अंगांत पायांत मोजे ॥
॥ फिरे ज्वानपठ्ठा हवाखात मौजें ॥ ७६ ॥

हवा बंगला बांधवीणें अरामी ॥
बगीचा पुढें लावणें एक नामी ॥
असावा मना गालिचा बैठकीला ॥
तसा लोड तक्या हि टेकावयाला ॥७७ ॥
निरोगी असावी मना दिव्य काया ॥
नको व्यर्थ अभ्यास विद्या शिकाया ॥
नको नौकरी चाकरी काम कांहीं ॥
मिळो द्रव्य खर्चावया सर्वदाही ॥ ७८ ॥
जरी काठि मोठी मना शालजोडी ॥
सुपीतांबराची मना फार गोडी ॥
करीं झांशिची रौप्य झारी विराजे ॥
मन-स्वारि शोभे जणूं रावराजे ॥ ७९ ॥
रुप्याचें मना ताट जेवावयाला ॥

॥ मना चंदनीं पाट बैसावयाला ॥
॥ करीं मुद्रिका कंकणें सोनियाची ॥
॥ दिसे रूप तारुण्य शोभा वयाची ॥ ८० ॥
॥ मना मोतियाचीं बहू मोल कंठीं ॥
॥ असावी मना सर्वदा आत्मकंठीं ॥
॥ जरी भर्जरी दिव्य पोषाख साजे ॥
॥ मन श्री-प्रभावें मनस्वी विराजे ॥ ८१ ॥
॥ मना बैठकीच्या सुशोभीत जागीं ॥
॥ छता भोंवतीं तस्बिरा सर्व भागीं ॥
॥ चहूं-बाजुं हंड्या मधें झुंबराची ॥
॥ दिसे दिव्य शोभा प्रभा दीपकांची ॥ ८२ ॥
॥ बिलोरी तिथें कांच मोठे असावे ॥
॥ रुपेरी पलंगीं सुखानें बसावें ॥

॥ पराच्या गदेल्यावरी शालजोडी ॥
॥ अशा बैठकींची मना फार गोडी ॥ ८३ ॥
॥ मना यापरी जाहली सर्व झाकी ॥
॥ परंतू मना राहिलें एक बाकी ॥
॥ असा थाट झाल्यावरी रम्य नारी ॥
॥ नको कां मना मंदिरीं सौख्यकारी ॥ ८४ ॥
॥ चुना काथ पानें लवंगा सुपारी ॥
॥ वरी वेलची केशराची खुमारी ॥
॥ शिशी अत्तराची मना कां नसावी ॥
॥ शुभांगी पलंगीं स्वकांता असावी ॥ ८५ ॥
॥ गऊ अश्वशाळा तसा गाडिखाना ॥
॥ गडी माणसे शुश्रुषेलाहि नाना ॥
॥ नसे कांहिं तोटा मनारे धनाचा ॥

॥ कसा राजकी थाट शोभे मनाचा ॥ ८६ ॥
॥ मन-स्त्रीविलासीं बहू लुब्ध झालें ॥
॥ रति-प्रेम शृंगार रंगांत आलें ॥
॥ तया बोधितां बोध कांहीं ठसेना ॥
॥ मना वैभवीं राम चित्तीं वसेना ॥ ८७ ॥
॥ मना बीन बाजामधें दंग होतां ॥
॥ सतारी मधें गान संगीत गातां ॥
॥ स्मराधीन होतां सुचेना विचार ॥
॥ करी यौवनीं नाहिं ते चार चार ॥ ८८ ॥
॥ कळेना मनाचें खरें अंतरंग ॥
॥ क्षणा माजि दावी असंख्यात रंग ॥
॥ मना नावरे वेग तूझा अभंग ॥
॥ तया वारितां थक्क झाला अभंग ॥ ८९ ॥

॥ मनाराज्य केलें गड्या योग्य खासें ॥
॥ परी पाहतां स्वप्नवत्सर्व भासें ॥
॥ अभागी नराला करी मा न छाया ॥
॥ वृथा कष्टवीसी मना आत्म काया ॥ ९० ॥
॥ मना हौस वेडी पुरे वासना ही ॥
॥ बसूनी गृहीं सौख्य होणार नाहीं ॥
॥ करी स्तुत्य उद्योग चालू असारे ॥
॥ तरी प्राप्त हो हें तुला सौख्य सारें ॥ ९१ ॥
॥ मनाआयतें सौख्य हो आळशाला ॥
॥ तरी काम धंदा करावा कशाला ॥
॥ श्रमा वांचुनी अर्थ कांहीं न लाधे ॥
॥ वृथा चिंतितां स्वार्थ कांहीं न साधे ॥ ९२ ॥
॥ अरे मूर्ख वेड्या मना दैव खोटें ॥

॥ मनोराज्य केलें गड्या व्यर्थ मोठें ॥
॥ मना हौस भारी तुला वैभवाची ॥
॥ तरी ज्ञान-बोधामृत-ग्रंथ वाची ॥ ९३ ॥

॥ मराठा हिरा छत्रधारी शिवाजी ॥
॥ मना वैभवें शौर्य कृत्यास गाजी ॥
॥ जयें कीर्ति विख्यात केली धरा जी ॥
॥ तिला पाहुनी जाहलें राष्ट्र राजी ॥ ९४ ॥
॥ जयाचा मना मंत्रि होता प्रतापी ॥
॥ रणीं सिंह जैसा रिपु श्वान कापी ॥
॥ पद भ्रष्ट केले शिवानष्ट पाजी ॥
॥ महाशूर योद्धा खरा एक बाजी ॥ ९५ ॥
॥ निजामा हजामा पराजीत केले ॥

॥ फिरंगी फितूरी रणीं रंगवीले ॥
॥ असे हैदरा बेदरासी दरारा ॥
॥ झडे शौर्य डंका यशस्वी नगारा ॥ ९६ ॥
॥ असा जन्मला ब्राह्मणी वीर गुंडा ॥
॥ रणीं गाजला ठोकुनी बाहु दंडा ॥
॥ मना वैभवें शौर्य आर्यास साजे ॥
॥ विरश्री प्रतापें धरा कीर्ति गाजे ॥ ९७ ॥
॥ मना विक्रमाच्या स्मरें विक्रमास ॥
॥ जयें चालवीलें सदा सुक्रमास ॥
॥ गुणें शौर्य औदार्य धर्माभिमानी ॥
॥ धरा कीर्ति घोषें स्फुरे गीरवानीं ॥ ९८ ॥
॥ हरिश्चंद्र राजा मना सत्व धीर ॥
॥ दिलें डोंब गेहीं विकोनी शरीर ॥

॥ सती सत्यशीला त्यजी रोहिदास ॥
॥ मुनि त्रास भोगे स्मशानीं निवास ॥ ९९ ॥
॥ नलाची मना ऐकिली कीर्ति कानीं ॥
॥ गुणें वैभवें धर्मकृत्यादिकांनीं ॥
॥ असे युक्त सर्वज्ञ जो भाग्यशाली ॥
॥ तपे भानु-रूपें यशस्वी-मशाली ॥ १०० ॥
॥ मना भर्तृगी सारिखा राज-योगी ॥
॥ अकस्मात झाला स्त्रियेचे नियोगी ॥
॥ जयें नीति, वैराग्य, शृंगार सार ॥
॥ बघूनी मना त्यागिला राज्यभार ॥ १०१ ॥
॥ क्षणी जाहला राज्य सांडोनि योगी ॥
॥ असंख्य स्त्रिया त्यागिल्या काम-भोगी ॥
॥ ज्यानें दिला मातृ वाक्यास मान ॥

॥ नसे भूपती गोपिचंदा समान ॥ १०२ ॥
॥ महा भाग्यशाली असंख्यात राजे ॥
॥ रसा कीर्ति घोषें यशस्वी विराजे ॥
॥ अशा वीर भूपा रमा योग्य साजे ॥
॥ मना दान धर्में बहू कीर्ति गाजे ॥ १०३ ॥
॥ मना भारती-वीर कोट्यान कोटी ॥
॥ पुराणीं कथा ऐकिली कीर्ति मोठी ॥
॥ धरा-पोटिं झालीं अशीं थोर रत्नें ॥
॥ जयें गाजवीलें स्वशौर्यं प्रयत्नें ॥ १०४ ॥
॥ अशा आर्य-भूमी-मधें जन्मलासी ॥
॥ मना कीटकीं साम्यता पावलासी ॥
॥ कसें पूर्वजें शौर्य केलें विलोकीं ॥
॥ मना व्यर्थ जीणें तुझें मृत्युलोकीं ॥ १०५ ॥

॥ मना अंगना-वस्त्र कां नेसलासी ॥
॥ करीं बांगडया घालुनी बैसलासी ॥
॥ कसें वीर पुर्षार्थि होवोनि गेले ॥
॥ मना दुर्बळा जन्मुनी काय केलें ॥ १०६ ॥

---

॥ मना नाद भारी तुला चौपटींचा ॥
॥ सदा खेळतां हर्ष हो चौपटींचा ॥
॥ तसा छंद भारी असे नाटकाचा ॥
॥ मना सर्वदा संग नाना ठकाचा ॥ १०७ ॥
॥ मना खेळतानां मनीं हर्ष दाटे ॥
॥ शिकाल्या गुणा कां मना दुःख वाटे ॥
॥ मना कीर्तना ऐकतां कां न जागे ॥
॥ तमाशा मधें अल्प निद्रा न लागे ॥ १०८ ॥

॥ जडे नर्तनीं चित्त शृंगार-गानीं ॥
॥ मना कीर्तना ऐकसी कां न कानीं ॥
॥ जसा शोक शृंगार खाण्यापिण्याचा ॥
॥ तसा कां न विद्या कला शीकण्याचा ॥ १०९ ॥
॥ फडाचा तमाशा बघायास धांवे ॥
॥ हरी कीर्तनीं झोंप येते स्वभावें ॥
॥ अवस्था परत्वें मना हाचि चाळा ॥
॥ करी दुष्कृती दोष देई कपाळा ॥ ११० ॥
॥ धना याचका द्यावया चित्त फाटे ॥
॥ वृथा नर्तनीं वेंचितां सौख्य वाटे ॥
॥ मना धर्म कृत्यास ये द्रव्य तोटा ॥
॥ करी चैनबाजी मधें खर्च मोठा ॥ १११ ॥
॥ मना द्रव्य देसी वृथा नाटकासी ॥

॥ फुकाची कथा आवडेना ठकासी ॥
॥ कलीमान पाहूनि आश्चर्य वाटे ॥
॥ बळें सद्म जाळी ह्मणे दैव खोटें ॥ ११२ ॥
॥ कुमार्गी सदा ही मनोवृत्ति लागे ॥
॥ सुमार्गी मना सन्मतीं कां न वागे ॥
॥ करायासि पुर्षार्थ ना द्रव्य गाठीं ॥
॥ गरीबी मना लागली नित्य पाठीं ॥ ११३ ॥
॥ यदा दैव योगें रमा ये घरासी ॥
॥ बहू गर्व येतो तदा त्या नरासी ॥
॥ चढे नेत्रिं धुंदी मना वैभवाची ॥
॥ पडे विस्मृती इष्टमित्रादिकांची ॥ ११४ ॥
॥ धनें मत्त होवोनियां होय मानी ॥
॥ परातें मना सर्वदा तुच्छ मानी ॥

॥ जयाचा जुना मित्र भोगी विपत्ती ॥
॥ करूं साह्य त्यातें असें ये न चित्तीं ॥ ११५ ॥
॥ करी एक त्याच्या द्विगूणीत सांगे ॥
॥ कथी ज्ञान, लोकां-व्यतीरिक्त वागे ॥
॥ स्वताची स्तुती वार्णितां जन्म गेला ॥
॥ मना पुण्य पुर्षार्थ कांहीं न केला ॥ ११६ ॥
॥ न दे आपुल्या दुर्गुणीं कोणि लक्ष ॥
॥ पराचें उणें काढण्या होति दक्ष ॥
॥ स्वयें दुर्गुणी दोष देती परास ॥
॥ मना काय ऐशा ह्मणावें नरास ॥ ११७ ॥
॥ उद्यां आज देतो असें कां ह्मणावें ॥
॥ परा नादि लावूनि कां चाळवावें ॥
॥ करारी असावी सदा सत्यवाणी ॥

॥ मना होय जी लौकिकीं सौख्यखाणी ॥ ११८ ॥
॥ मना लौकिकीं थोरवी दाखवाया ॥
॥ पराचें करावें बळें कर्ज वांया ॥
॥ मना प्राप्तिहूनी करी खर्च मोठा ॥
॥ पुढें होय त्याचा परीणाम खोटा ॥ ११९ ॥
॥ मना आचरे कृत्य लोकां विरुद्ध ॥
॥ तरी तूज कोणी ह्मणावें प्रबुद्ध ॥
॥ मना सज्जनाची सुरीती धरावी ॥
॥ सदा त्याप्रमाणें कृती आचरावी ॥ १२० ॥
॥ जया पासुनीं प्राप्ति होते धनाची ॥
॥ वसे तोंवरी भक्ति तेथें जनाची ॥
॥ दरिद्री नराला नसे मान लोकीं ॥
॥ तयाचें मना व्यर्थ जीणें विलोकीं ॥ १२१ ॥

॥ धना वांचुनी मान नाहीं गुणाला ॥
॥ बहूमान देती जनीं भूषणाला ॥
॥ मना दैन्यवाणी स्थिती ही नसावी ॥
॥ मना लौकिकीं संपदाही असावी ॥ १२२ ॥
॥ दरिद्र स्थिती फार निकृष्ट लोकीं ॥
॥ जरा मान नाहीं नरा त्या विलोकी ॥
॥ धनाची जनासी मना फार गोडी ॥
॥ म्हणूनी मना निश्चयें द्रव्य जोडी ॥ १२३॥
॥ श्रमें कार्य कांहीं करावें सुसिद्ध ॥
॥ धना वांचुनी तें न होई प्रसिद्ध ॥
॥ दरिद्री मना सांग इच्छा न हो ते ॥
॥ म्हणूनी मना मानसीं दुःख होतें ॥ १२४ ॥
॥ पराधीनता ती नको देवराया ॥

॥ किती कष्टवावी सदा आत्मकाया ॥
॥ नको ही मना याचना फार खोटी ॥
॥ सुखानें मिळो कोरडी मीठ-रोटी ॥ १२५ ॥
॥ मना राजगेहीं असे कल्पवृक्ष ॥
॥ तया काय यावीं फळें तीव्र रुक्ष ॥
॥ जया पाहुनी तृप्ति नोहे दिनाची ॥
॥ मना काय शोभा अशा वैभवाची ॥ १२६ ॥
॥ मना ज्या गृहीं श्री-तरूचा निवास ॥
॥ फुलें त्यास येतीं परी ये न वास ॥
॥ तया घालितां सर्वदा धर्म-तोय ॥
॥ सुकीर्ती फुलांनीं प्रफुल्लीत होय ॥ १२७ ॥
॥ मना चंचला श्री न राहे अखंड ॥
॥ तरी बाळगावी वृथा कां घमंड ॥

॥ दिनाची मना सर्वदा कींव घ्यावी ॥
॥ मना वैभवीं नम्रता अंगिं यावी ॥ ११८ ॥
॥ असे पुत्रदारा धनाचा सुकाळ ॥
॥ तयें कां न ध्यावा मना विश्वपाळ ॥
॥ जया दुःख चिंता सुखाचा न लेश ॥
॥ मना तोहि कां रे स्मरेना महेश ॥ १२९ ॥
॥ मना वैभवीं लाभती मित्र नाना ॥
॥ बहू भोजनीं मिष्ट पानीं तनाना ॥
॥ सदा भृंग-रंगीं बहू रंगताती ॥
॥ प्रमोदें मना गीत संगीत गाती ॥ १३० ॥
॥ मना सोयरे धायरे हे धनाचे ॥
॥ विपत्ती मधें कोणि नाहीं कुणाचे ॥
॥ प्रसंगीं मना येइ मामा न कामा ॥

॥ म्हणोनीं मना आठवी नित्य रामा ॥१३१॥
॥ मना साधितो आपुला स्वार्थ जो तो ॥
॥ पराचे हितीं लक्ष्य कोणी न देतो ॥
॥ स्वताचें जसें दुःख चित्तांत बाणें ॥
॥ पराचें मना दुःख तें कोण जाणें ॥ १३२ ॥
॥ मना सारिखे बोलतां मोद होतो ॥
॥ कटू भाषणीं मित्र ही शत्रु हो तो ॥
॥ हिताचीं वचें वाउगी होति त्यासी ॥
॥ खरें-भाषणीं कोप येतो पित्यासी ॥ १३३ ॥
॥ सुखी होति गोळा मना मित्र सोळा ॥
॥ परी संकटीं पाहती मौज डोळां ॥
॥ प्रसंगीं परिक्षा मना होय अन्य ॥
॥ करी साह्य वेळीं मना तोचि धन्य ॥ १३४ ॥

॥ तुझे कारणीं प्राण देऊं सुमित्रा ॥
॥ असे बोलणारे मना मित्र सत्रा ॥
॥ खरी वेळ येतां स्वमुद्रा न दावी ॥
॥ असा संगती मित्र तोंडीं न लावी ॥ १३५ ॥
॥ पडेना मना अन्य कामास काय ॥
॥ तया पाळितां पोषितां अर्थ काय ॥
॥ प्रसंगीं पराची नये ज्यास माया ॥
॥ तयाची मना जाणिजे नष्ट काया ॥ १३६ ॥
॥ जिवालागीं ठेवी मना जो अरामीं ॥
॥ पडेना कधीं अन्य कामीं हरामी ॥
॥ वरी मिष्ट बोलोनियां कार्य साधी ॥
॥ अशाचे मना लागसीं काय नादी ॥ १३७ ॥

# शिवाचे अनंत उपकार.

॥ मना आड मार्गी असे एक गांव ॥
॥ तया हारसोला सुविख्यात नांव ॥
॥ महू छावणी पासुनी दोन कोस ॥
॥ जिथें नांदतो सांबभोळा सुरेश ॥ १३८ ॥
॥ गुरु दर्शना घेउनी गेहिं येतां ॥
॥ पुढें चालतां सूर्य अस्तासि जातां ॥
॥ पथा सोडुनी माउली आडरानीं ॥
॥ पुढें चालली एकटी दीनवाणी ॥ १३९ ॥
॥ पथीं चालतां शीणली फार माय ॥
॥ वनीं दुःख भोगे करी कष्टि काय ॥
॥ नसे मार्ग ठावा सुचेना उपाय ॥

॥ रडोनी मना आठवी राम-पाय ॥ १४० ॥
॥ बसूनी निशी काढिली एक जागीं ॥
॥ कशी पातली दुष्ट वेळा अभागी ॥
॥ म्हणे, वैरिणी-रात्र ही शीघ्र जावो ॥
॥ अशी वेळ देवा न वैऱ्यास येवो ॥ १४१ ॥
॥ मनस्वी शिव प्रार्थिला त्यां दयाळ ॥
॥ तदां पावला संकटीं विश्वपाळ ॥
॥ तयानें मना ऐकिली दीनवाणी ॥
॥ म्हणी साह्य झाला वनीं शूलपाणी ॥ १४२ ॥
॥ नसे भीति चिंता तियेचे मनांत ॥
॥ निशी कांठिली सर्वही काननांत ॥
॥ नसे वस्त्र अंगीं न थंडी न वारा ॥
॥ शिवानें दिला धैर्यरूपीं निवारा ॥ १४३ ॥

॥ मना काननीं रक्षिली वृद्ध माता ॥
॥ महारिष्ट टाळी प्रभु प्राण-दाता ॥
॥ उषःकाळिं दावी तिसी ग्रामपंथ ॥
॥ सुखानें गृहीं पोंचवी विश्वनाथ ॥ १४४ ॥
॥ तदां काळजी भीति चिंता निवाली ॥
॥ मना माउली जेधवां गेहिं आली ॥
॥ तिला पाहुनी जाहला हर्ष फार ॥
॥ किती भार वानूं शिवाचे अपार ॥ १४५ ॥
॥ मुळारंभिं वर्षा-मधें वृद्धि-मास ॥
॥ तिथीं शुक्लपक्षीं दशत्री प्रदोष ॥
॥ ग्रहानिष्ट होता तदां सौम्यवार ॥
॥ अशा काळरात्रीं घडे हा प्रकार ॥ १४६ ॥
॥ मना पुर्वितो सर्वही वांछितार्थ ॥

॥ तया ध्यावुनी कां न होसी कृतार्थ ॥
॥ शिवाचे मना दास्य कां ना करावें ॥
॥ वृथा जन्मुनी मृत्यु लोकीं मरावें ॥ १४७ ॥
॥ मना दीन वाणी श्रवूनी दयाळ ॥
॥ त्वरें धांवतो संकटीं विश्वपाळ ॥
॥ तयाचे मना नाम घेई अखंड ॥
॥ बहू सौख्य लाभे चुके काळ-दंड ॥ १४८ ॥
॥ वसे देव चित्तीं सदा भाविकाचें ॥
॥ करी दास्य भावें सदा सेवकाचें ॥
॥ असा सर्व साक्षी महादेव भोळा ॥
॥ बघावें मना निश्चयें त्यासि डोळां ॥ १४९ ॥
॥ जयाची नुती वर्णितां वेदचारी ॥
॥ श्रमी जाहले तत्ववेत्ते विचारी ॥

॥ मना देव ब्रम्हादिकां आकळेना ॥
॥ पुराणांतरीं अंत ज्याचा कळेना ॥१५०॥
॥ मृडानी मना वामभागीं विराजे ॥
॥ गळां रुंडमाळा उटी भस्म साजे ॥
॥ जटा मस्तकीं चंद्रमा आणि गंगा ॥
॥ कधीं ध्यान ऐसें दिसें या अभंगा ॥ १५१ ॥
॥ फणी भूषणें वेष्टिलीं सर्व अंगीं ॥
॥ सदा मग्न राहे मना आत्मरंगीं ॥
॥ गणेशा कुमारा बघूनी सुखानें ॥
॥ जया अंबिका खेळवी कौतुकानें ॥ १५२ ॥
॥ शिव प्राप्तिलागीं मना त्वां झटावें ॥
॥ बहु विघ्न येतां परी ना हटावें ॥
॥ वदावें सदा नाम वाचे वदावें ॥

॥ भजावें मना रे शिवातें भजावें ॥ १५३ ॥
॥ जरी कां कृपा हो दयाळू शिवाची ॥
॥ तरी सर्व इच्छा पुरे या जिवाची ॥
॥ ह्मणूनी मना सांब भोळा भजावा ॥
॥ मना गर्व संताप हेवा त्यजावा ॥ १५४ ॥
॥ मना भक्ति ठेवीं शिवाची सदाही ॥
॥ नसे भीति कांहीं जिवाची कदांही ॥
॥ शिवाचे पदीं लीन होवोनि राही ॥
॥ तरी काम-बाधा न बाधे जराही ॥ १५५ ॥
॥ शिवाचें मुखीं नाम वाचेसि चाळा ॥
॥ तयाच्या गळां शोभती अक्षमाळा ॥
॥ मना स्वल्प ही साधना साध वाचे ॥
॥ धरीं पाय यत्नें मना साधवाचे ॥ १५६ ॥

॥ अखंड स्मरावें मना शंकरासी ॥
॥ सदा संकटीं रक्षितो किंकरासी ॥
॥ कदापी मना विस्मृती ना पडावी ॥
॥ तयाच्या पदीं चित्तवृत्ती जडावी ॥ १५७ ॥
॥ मना श्रीहरी पुर्वितो सर्व कोड ॥
॥ वसो सर्वदा चित्तिं तन्नाम गोड ॥
॥ सुरां माजि भोळा असा विश्वनाथ ॥
॥ मना कां न डोळां बघावा सनाथ ॥१५८॥
॥ मना चालतां बोलतां नाम घ्यावें ॥
॥ घरीं दारिं शय्येवरी ही स्मरावें ॥
॥ करी काम धंदा तदां आठवावें ॥
॥ मना सर्वदा नाम वाचे वदावें ॥ १५९ ॥
॥ मना राम-पायीं सदा लक्ष्य ठेवीं ॥

॥ मधू सेवनीं मक्षिका दक्ष जेवीं ॥
॥ मधू-लोलुपा भीति नाहीं जिवाची ॥
॥ हरी चिंतनीं भीति नाहीं भवाची ॥ १६० ॥
॥ मुखीं नाम घेई सदा राघवाचें ॥
॥ सुखी धन्य लोकीं जिणें मानवाचें ॥
॥ हरी नाम हें पाश तोडी भवाचे ॥
॥ म्हणूनी मना नाम घ्यावें सुवाचे ॥ १६१ ॥
॥ हरीची कृपा होय ज्या मानवासी ॥
॥ तयासी नको तीर्थ-यात्रादि काशी ॥
॥ मना मुक्त तोची तयाच्या पदासीं ॥
॥ रमा ऋद्धि सिद्धी रती होय दासी ॥१६२॥
॥ विधीची कृती फार मोठी विशाळ ॥
॥ तयें निर्मिलें माणसाचें कपाळ ॥

॥ मना मोह सारा असे चामड्याचा ॥
॥ परी पाड कांहीं न साचा मढ्याचा ॥१६३॥
॥ नवें कातडें पाहुनी फार गोरें ॥
॥ मना त्यावरी ठेविती प्रीति पोरें ॥
॥ रति-प्रेम-पाशा-मधें चित्त घोळें ॥
॥ धनें यौवनें झांकिती सर्व डोळे ॥ १६४ ॥
॥ मना लागलें चामड्याचें पिसें ना ? ॥
॥ परी चामडे निर्मितां तो दिसेना ॥
॥ मना बद्ध होसी जसा काम-पाशीं ॥
॥ तसा लीन होई प्रभूच्या पदाशीं ॥ १६५ ॥
॥ भग प्राप्ति लागीं मना होसि मग्न ॥
॥ तसा राम-नामीं सदा हो निमग्न ॥
॥ असें लागतां ध्यान बारे अभंग ॥

॥ मना धन्य होसी कुळीं या अभंग ॥१६६॥

॥ जगीं शहाणा काय तो मीच आहे ॥
॥ असें मानुनी कोरडा गर्व वाहे ॥
॥ कळेना मनाला असंख्यात कोटी ॥
॥ हिरे सद्गुणी जन्मले भूमि-पोटीं ॥ १६७ ॥

॥ मना व्यक्तिमात्रा गमे मीच मोठा ॥
॥ गुणी हुन्नरी मी मला काय तोटा ॥
॥ नसे कोणि माझ्यापरी दिव्य गोटा ॥
॥ असें मानणें हा अभीमान खोटा ॥ १६८ ॥

॥ वयानें रुपानें गुणानें हुषार ॥
॥ नसे कोणि माझ्यापरी अन्य शूर ॥
॥ मना मीपणाची तुळा ऐट मोठी ॥
॥ हिऱ्याच्या पुढें ती जशी गारगोटी ॥१६९॥

॥ मुखानें स्वताचे गुणस्तौत्य वाणी ॥
॥ तया सारिखा मूर्ख लोकीं न कोणी ॥
॥ जयाचे गुण श्रेष्ट वाखाणितात ॥
॥ तयासी मना सर्वही मानितात ॥ १७० ॥
॥ नकोरे मना आपुलें स्तौत्य गाऊं ॥
॥ नको वैभवाचा जना डौल दावूं ॥
॥ नको सद्गुणाचा मनीं गर्व वाहूं ॥
॥ दुराचार-कर्मी नको दुःख साहूं ॥ १७१ ॥
॥ पराची कुटाळी वृथा कां करावी ॥
॥ मना द्वेष-बुद्धी वृथा कां धरावी ॥
॥ करी साह्य वेळीं तया आठवावें ॥
॥ मना भार त्याचे हृदीं साठवावे ॥ १७२ ॥
॥ मना सत्य-वाणी तपाचे समान ॥

॥ असत्यास लोकीं नसे खास मान ॥
॥ तरी अनृता त्यागुनी सत्य सेवीं ॥
॥ मना शांतता लीनता अंगिं ठेवीं ॥ १७३ ॥
॥ परा दुःख देणें असे पाप मोठें ॥
॥ तया पासुनी आपुले होति तोटे ॥
॥ दिलें दुःख ज्यानें तया नाठवावें ॥
॥ प्रसंगीं मना साह्य त्यासी करावें ॥ १७४ ॥
॥ कटू भाषणें दुर्जनाचीं मिळावीं ॥
॥ मना योग्यता सज्जनाची कळावी ॥
॥ विचारी मना सुष्ट कृत्यें करावीं ॥
॥ विचारी मना शांत-वृत्ती धरावी ॥ १७५ ॥
॥ मना सर्वदा क्रोध वारीत जावा ॥
॥ मना गर्व हा दुष्ट वैरी त्यजावा ॥

॥ मना काळ हा व्यर्थ वांया न जावा ॥
॥ मना राम-कोदंड-धारी भजावा ॥ १७६ ॥
॥ घडे गोष्टिचा शोक वाहूं नकोरे ॥
॥ पुढें काय होईल चिंतू नकोरे ॥
॥ अरे पुत्रदारा धनाचा पसारा ॥
॥ तुला अंतकाळीं नसे कोणि थारा ॥ १७७ ॥
॥ मना काय हा अन्य कार्यीं पडावा ॥
॥ मना संग तो सज्जनाचा घडावा ॥
॥ हिरा सद्गुरू बोध चित्तीं जडावा ॥
॥ वरी ज्ञान वैराग्य पायीं खडावा ॥ १७८ ॥
॥ नसे भेद बुद्धी जयाचें मनांत ॥
॥ उदासीन वृत्ती दिसे सज्जनांत ॥
॥ मना शत्रु मित्रास मानी समान ॥

॥ खरा सद्गुरू तो जनीं त्यास मान ॥१७९॥
॥ धना लागिं देई तृणा साम्य मान ॥
॥ परस्त्रीस मानी स्वमाते समान ॥
॥ धनीका गरीबा-वरी साम्यभाव ॥
॥ मना साधवाचा असा सुस्वभाव ॥ १८० ॥
॥ जया संगतीनें जगीं कीर्ति होते ॥
॥ मना मुक्ति जी सद्गती प्राप्त हो ते ॥
॥ नसे जन्म मृत्यू पुन्हां वेरझार ॥
॥ अशा संगतीचा करीं यत्न फार ॥ १८१ ॥
॥ मना सत्यवक्ता विवेकीं निवाला ॥
॥ सदा कर्म त्यागी भजे जो शिवाला ॥
॥ मनीं क्रोध ना लोभ हाही जयाला ॥
॥ अशा सज्जनाचे नमावें पदाला ॥ १८२ ॥

॥ उमावल्लभाच्या-पदीं लक्ष्य लावी ॥
॥ सदा अंतरीं भावना शुद्ध ठेवी ॥
॥ नसे ताप संताप तोरा जयासी ॥
॥ तयानें मना जिंकिलें इंद्रियांसी ॥ १८३ ॥
॥ हरी पूजनीं सेवनीं काळ जातो ॥
॥ सदा कीर्तनीं धांव घेवोनि जातो ॥
॥ वृथा काळ तो काळ वाटे जयासी ॥
॥ तयानें मना जिंकिलें इंद्रियांसी ॥ १८४ ॥
॥ तपानें जयें साधिली सर्व सिद्धी ॥
॥ नसे अंतरीं लेश ही पाप-बुद्धी ॥
॥ करी पुण्य-कर्मे न सांगे परासी ॥
॥ तयानें मना जिंकिलें इंद्रयांसी ॥ १८५ ॥
॥ स्त्रिया कामिनी पद्मिनी ही मिळाल्या ॥

॥ बहू सुंदरा मंदिरां प्राप्त झाल्या ॥
॥ खरा तोचि योगी न भोगी तयांसी ॥
॥ तयानें मना जिंकिलें इंद्रियांसी १८६ ॥
॥ रसीं षड्रसीं स्वाद ज्यासी समान ॥
॥ तया कां न देगें सता-साम्य मान ॥
॥ मृदू अन्न सेवी तनू रक्षणासी ॥
॥ तयानें मना किंकिलें इंद्रियांसी ॥ १८७ ॥
॥ असा कोटिमाजीं निवे पुण्यवंत ॥
॥ तयाचे मना दास होती अनंत ॥
॥ नमस्कार माझा अशा योगियासी ॥
॥ जयानें खरें जिंकिलें इंद्रियांसी ॥ १८८ ॥
॥ त्रयस्थानिं वैराग्य ये मानवास ॥
॥ घडे भोजनांतीं स्मशानीं निवास ॥

॥ तशी हो विरक्ती मना मैथुनांतीं ॥
॥ पडे विस्मृती मोह माया क्षणांतीं ॥ १८९ ॥
॥ मना योग माया हरीची विचित्र ॥
॥ क्षणीं गारुडी खेळ दावी सचित्र ॥
॥ मना थोर सामर्थ्य जीचें कळेना ॥
॥ जिला शोधितां चित्त-वृत्ती वळेना ॥१९०॥
॥ मना धन्य तो संत मायेस जिंकी ॥
॥ सदा लोळतो मोक्ष ज्याचे पदांकीं ॥
॥ असा सृष्टि मध्यें निधे भाग्यवंत ॥
॥ जयासी मना प्राप्त होतो अनंत ॥ १९१ ॥
॥ करी स्नान संध्या व्रतें नेम भारी ॥
॥ पठे शैव गीता जटा-भस्म-धारी ॥
॥ गळां अक्ष-माला दिसे कीं महंत ॥

॥ तयासा मना कां न पावे अनंत ॥ १९२ ॥
॥ मना अंतरीं भावना शुद्ध नाहीं ॥
॥ करी धर्म कर्में वृथा साधना ही ॥
॥ जया षड्रिपू जिंकणें हें न ठावें ॥
॥ तयासी मना श्रीहरी केंवि पावे ॥ १९३ ॥
॥ मना स्वार्थ साधावया राहि दक्ष ॥
॥ परी ईश पायीं सदा ठेवि लक्ष ॥
॥ प्रसंगीं मना सेवि ऋक्षान्न-भक्ष ॥
॥ करी कर्म जें तूं विचारें समक्ष ॥ १९४ ॥
॥ सदा काय रोगी नसे रूप तेज ॥
॥ नसे मान लोकीं न विद्या सतेज ॥
॥ नसे इंदिरेचा तुझ्या गेहिं वारा ॥
॥ मना जन्म गेला वृथा दुःखिं सारा ॥१९५॥

॥ मना सत्य-माता पिता ज्ञानदेव ॥
॥ करी साह्यता धर्म-बंधू सदैव ॥
॥ दया ती स्वसा कीं क्षमा हा सुपुत्र ॥
॥ कुटुंबी मना शांति दारा पवित्र ॥ १९६ ॥
॥ मना पाहतां ऐकतां जन्म गेला ॥
॥ कळोनी मना शुद्ध पाषाण ठेला ॥
॥ कधीं चित्त-वृत्ती तुझी पालटेल ॥
॥ कधीं व्याप संताप बाधा मिटेल ॥ १९७ ॥
॥ मना ज्ञान भानू हृदीं दे प्रकाश ॥
॥ तदा होय अज्ञान अंधार नाश ॥
॥ मना पायरी निश्चयाची न सोडी ॥
॥ विवेकें मना मोक्ष मार्गास जोडी ॥ १९८ ॥
॥ मना जन्म झाला तुला मृत्यु लोकीं ॥

॥ तरी स्तुत्य कर्तव्य-कर्मा-विलोकीं ॥
॥ वृथा मीपणें डोलसी काय भारी ॥
॥ कळेना मना कोण तूं नामधारी ॥ १९९ ॥
॥ वृथा वेंचियेलें मना आयु सारें ॥
॥ जनीं कर्म केलें मना त्वां निषिद्ध ॥
॥ तरी होइ आतां पुढें सावधान ॥
॥ हरी पायिं ठेवीं मना संविधान ॥ २०० ॥
॥ नसे भेद कांहीं हरी शंकरांत ॥
॥ मना मानि जो त्या गणी किंकरांत ॥
॥ जगाचा नियंता असे देव एक ॥
॥ धरी दुष्ट नाशार्थ रूपें अनेक ॥ २०१ ॥
॥ सदा देवराणा उभा भक्त-पाठीं ॥
॥ परी पाहिजे सद्गुरू आड-काठी ॥

॥ तया वांचुनी अन्य नाहीं उपाय ॥
॥ धरी रे मना सद्गुरू योग्य पाय ॥ २०२ ॥
॥ गृहीं ठेविली वस्तु दृष्टीं पडेना ॥
॥ मना शोधितां ती परी सांपडेना ॥
॥ पटा-आड आहे कळें सत्य यातें ॥
॥ नये सद्गुरू वांचुनी प्रत्ययातें ॥ २०३ ॥
॥ मना ओळखी तूं चि रे आपणातें ॥
॥ त्यजी लोभ हेवा मना मीपणातें ॥
॥ पुढें सद्गुरू दर्पणीं रूप पाहें ॥
॥ कृपें वांचुनी सर्वथा प्राप्त नोहें ॥ २०४ ॥
॥ कली माजि सोपा असे हा उपाव ॥
॥ जडो राम-नामीं मना शुद्ध भाव ॥
॥ नको साधनें अन्य नामा निराळी ॥

॥ अखंड स्मरावा मना चंद्र मौळी ॥ २०५ ॥
॥ अझूनी मना सद्गुरू नाहिं केला ॥
॥ म्हणूनी तुझा काळ हा व्यर्थ गेला ॥
॥ तरी पाहुनी सद्गुरू घेइ मंत्र ॥
॥ भवाब्धी तरी पार होईं स्वतंत्र ॥ २०६ ॥
॥ मना सज्जना बोध हा योग्य केला ॥
॥ तया ऐकुनीयां अनूताप झाला ॥
॥ किती यातना भोगणें अंतकाळीं ॥
॥ म्हणोनी मना बोध हा नित्य पाळीं ॥२०७॥
॥ मना बोध बोधी तुला हा अभंग ॥
॥ तरी अंतरीं बाळगीं हा अभंग ॥
॥ पुढें पावसी सज्जनाचे पदाला ॥
॥ नमीं सर्वदा शंकराचे पदाला ॥ २०८ ॥

॥ मना बोध हा नित्य वाची सकाळीं ॥
॥ करीं पाठ याचा पुन्हां सामकाळीं ॥
॥ नसे भीति बारे तुला अंतकाळीं ॥
॥ यमाचे करीं सोडवी भद्रकाळी ॥ २०९ ॥
॥ पदीं नमित जा सदा गुरुचिया मना चंचळा ॥
॥ विना स्व-ललना मना धरि न तूं परस्त्रीं-ळळा ॥ सदा मधुर भाषणें रिझवि तूं जनाच्या मना ॥ हरी चरण जा धरीं अशि तुला मना प्रार्थना ॥ २१० ॥



## पद्मबंध.

॥ नाम राम जप हा करतां मना ॥
॥ नाम तारक भजें तरि वामना ॥
॥ नाम वारिल तुझ्या भवयातना ॥
॥ ना तया वरिसि कां भ्रमरामना ॥ १ ॥



# देवास प्रार्थना.

## पद

( लक्ष्मि जगदंबा, या चालीवर. )

॥ इतुकें दे देवा, महादेवा ॥ नित्य घडो तव सेवा ॥ इतुकें दे देवा० ॥ धृ० ॥
॥ बाइल बुद्धी धनी बावळा ॥ हरामि नोकर नसावा ॥ इतुकें० ॥ १ ॥ फार लाडका मूर्ख चोरटा ॥ कुपात्र बेटा नसावा ॥ इतुकें०॥२॥
॥ स्वहित साधनी मिष्ट-भाषणीं ॥ कपटी-स्नेही नसावा ॥ इतुकें० ॥ ३ ॥ अधासि दारा परत्र-गमनीं ॥ अंगीं ताठा नसावा ॥ इतुकें० ॥४॥
॥ आप्त सोयरा फार दरिद्री ॥ मूर्ख जावई

नसावा ॥ इतुकें० ॥ ५ ॥ स्वजन विरोधी दुष्ट
घातकी ॥ द्वेषी बांधव नसावा ॥ इतुकें० ॥६॥
बहू बोलका बरा न खुनशी ॥ गर्वी मालक
नसावा ॥ इतुकें० ॥ ७ ॥ कारस्थानी वरिष्ट
लोभी ॥ जुलमी राजा नसावा ॥ इतुकें० ॥ ८ ॥
॥ वेळ प्रसंगीं कामीं नच ये ॥ कुश्चित शेजार
नसावा ॥ इतुकें० ॥ ९ ॥ मूर्ख आळशी कपटी
निंदक ॥ मतलबि शिष्या नसावा ॥ इतुकें०
॥ १० ॥ असत्यवादी ज्ञानबोधितां ॥ गुरू
लालची नसावा ॥ इतुकें० ॥ ११ ॥ श्रीमंता-
च्या गृहीं करंटा ॥ भांडारी पण नसावा ॥
॥ इतुकें० ॥ १२ ॥ गंगाधर पदिं नसे भावना ॥
जन्म अभागी नसावा ॥ इतुकें दे देवा महा-
देवा ॥ लाभ तुझा बा व्हावा ॥ इतुकें० ॥ १३ ॥

# मात्रोपकार.

॥ नमातुः पर दैवतं ॥

## " वसंत तिलका "

॥ पुत्रासि दैवत नसे जननी समान ॥
॥ भार्येसि दैवत खरें पति हें प्रमाण ॥
॥ शिष्यासि दैवत नसे गुरुवीण अन्य ॥
॥ भक्तासि दैवत हरी जगतांत धन्य ॥ १ ॥
॥ गर्भा-मधें जननिला श्रम फार होती ॥
॥ काठिण्य दुःखद दशा स्मरणें अहो ती ॥
॥ हो क्लेशरूप ऋण तें अनुपम्य माथां ॥
॥ उत्तीर्ण सेवनिं न हो शत जन्म घेतां ॥ २ ॥

## ( शा. वि. )

॥ मातेच्या कुशिं गर्भ संभव घडे तैं पासुनी

यातना ॥ होती फार जिला प्रसूत समयीं प्राणांतशा वेदना ॥ यत्नें रक्षण लक्ष्य लावुनि पुढें कष्टें सुता पाळिते ॥ तैसें वाढविते सु-शिक्षण तया देवोनि सांभाळिते ॥ ३ ॥

" साकी "

॥ पुत्ररक्षणीं जननी-लागीं, कष्ट फार ते होती ॥ जाणुनि सेवा सतत करावी, स्मरुनि उपकृति अहो ती ॥ हें कां सांगावें ॥ विवेक धरुनी वागावें ॥ ४ ॥

( शा. वि. )

॥ मातेचे उपकार फार असती पुत्रा करी कल्पना ॥ त्यांतूनी ऋणमुक्त होशिल अशी ठेवीं मनीं वासना ॥ मातेच्या उदरांत मी

निपजुनी केलें नसे सार्थक ॥ यासाठीं विनती शिवा तवपदीं आहे मनःपूर्वक ॥ ५

"भुजंग प्रयात."

॥ बहू कष्टि दुःखी असे वृद्ध माता ॥
॥ तरी पूर्ण आयू तिला दे अनंता ॥
॥ तिच्या सेवनीं काय माझा झिजावा ॥
॥ तिचा हेतु वायां कदांही न जावा ॥ ६ ॥
॥ तिचे काय आभार वर्णू मुखानें ॥
॥ तिचा शेष हा काळ जावो सुखानें ॥
॥ कटू भाषणा बोलते कोपयुक्त ॥
॥ परी योग्य मातें नसे तें अयुक्त ॥ ७ ॥

"वसंत तिलका."

॥ माते तुझ्या उदरिं मी निपजूनि पाहीं ॥

॥ केलें न सार्थक जगीं गमतें चि कांहीं ॥
॥ सेवा तुझी किमपिही घडली न मातें ॥
॥ आहे बहू मम-शिरीं तव भार माते ॥ ८ ॥
॥ बोलोनियां तुजसि म्यां बहू गांजियेलें ॥
॥ नाहीं कधीं हितवचा तव मानियेलें ॥
॥ कांहीं तरी निज मनीं धरिलेस कां, तें ॥
॥ आहे बहू मम-शिरीं तव-भार माते ॥ ९ ॥
॥ मी जन्मतां मम पिता परलोकिं गेला ॥
॥ अज्ञान बाल असतां प्रतिपाल केला ॥
॥ मत्पोषणीं श्रम तुला पडले महा ते ॥
॥ आहे बहू मम-शिरीं तवभार माते ॥ १० ॥

**पद.**

**( चाल– थोर तुझे उपकार. )**

॥ स्मरतें मज वदुं काय ॥ माते स्मरतें मज

वदुं काय ॥ धृ. ॥ तव सेवेला शिवला नाहीं ॥ नष्टचि हा मम काय ॥ माते० ॥ १ ॥ ॥ तदुपकारा पाराचि नेणें ॥ केलेसी सदुपाय ॥ माते० ॥ २ ॥ बाळपणीं मम पिता-वियोगें ॥ ॥ झाला तुजसि अपाय ॥ माते० ॥ ३ ॥ ॥ मत्पोषणिं तूं वनीं फिरोनी ॥ केले फार उपाय ॥ माते० ॥ ४ ॥ जन्मा पासुनि दुःख भोगुनी ॥ शिणला गे तव काय ॥ माते० ॥५॥ ॥ आनंदानें कधिं नच म्यां ते ॥ सेवियलें तव पाय ॥ माते० ॥ ६ ॥ अंतकाळिं तरा चिरसुख देई ॥ कृपाकरीं यदुराय ॥ माते० ॥ ७ ॥ ॥ दास प्रार्थना मान्य करीं हरी ॥ सुखवी माझी माय ॥ माते० ॥ ८ ॥ गंगाधर हा वृथा जन्मला ॥ पुत्र तुझा निरुपाय॥ माते० ॥ ९ ॥

# " उपसंहार "

## आर्या.

॥ नान्यग्रंथ विलोकन ॥
॥ नाहीं विशेष ज्ञान सामान्य ॥
॥ करितों काव्य परी हें ॥
॥ केवीं हो विबुध मानसा मान्य ॥ १ ॥

## श्लोक.

॥ न वृत्त शास्त्रन्न हि वेद शास्त्र ॥
॥ मधीत मन्ये न हि चापि ग्रंथाः ॥
॥ गंधर्व-विद्या न तथाप्यधीता ॥
॥ इयं कृतिर्विश्व-भरस्य प्रीतये ॥ २ ॥